राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत कोल्हापूर जिल्हा सहकारी दूध उत्पादक संघ, लि., (गोकुळ) यांच्या शिरोळ , जि.कोल्हापूर येथे अद्यावत दूध प्रक्रिया प्रकल्प (Satellite Dairy) उभारणी व शिरगाव, जि.कोल्हापूर येथील दुग्धशाळेचे आधुनिकीकरण व बळकटीकरण करणे व ETP प्लांट उभारणी या दोन प्रकल्पांना प्रशासकीय मंजूरी व निधी वितरीत करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राकृवि २०१४/प्र.क्र.४५/पदुम-८**
मंत्रालय- विस्तार, मुंबई ४०० ०३२
तारीख: ३० जुलै, २०१४

वाचा : १. राष्ट्रीय कृषि विकास योजना मार्गदर्शक सूचना २०१४
२. कृषि व पदुम विभागाचे क्र. आरकेव्ही- ०५१४/सी.आर.२६/आरकेव्हीवाय सेल, दि.१८.७.२०१४ अन्वये निर्गमित केलेले राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त
३. केंद्र शासनाच्या कृषि मंत्रालयाचे पत्र क्र. १-१/२०१२-डीपी, दिनांक १५.५.२०१४

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाने संदर्भ क्रमांक १ अन्वये राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत केंद्रीय सहाय्याकरीता प्रस्तावित करण्यात येणाऱ्या प्रकल्पांकरीता सुधारीत मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. सदर मार्गदर्शक सूचनानुसार उत्पादन व वृध्दी, पायाभूत सुविधा व साधनसामुग्री, विशेष योजना व परिवर्तनशील निधी या घटकांतर्गत प्रकल्प विचारात घेवून त्यास मान्यता देणे अपेक्षित आहे. दुग्धव्यवसाय या उपविभागांतर्गत पायाभूत सुविधा व साधनसामुग्री या घटकाखाली राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत खालील २ प्रस्ताव दिनांक ५.७.२०१४ रोजीच्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या बैठकीत विहित कार्यपध्दतीनुसार सादर करण्यात आले होते. १. कोल्हापूर जिल्हा सहकारी दूध उत्पादक संघ, लि., (गोकुळ), ता. शिरोळ, जि.कोल्हापूर येथे अद्यावत दूध प्रक्रिया प्रकल्प (Satellite Dairy) उभारणी२. कोल्हापूर जिल्हा सहकारी दूध उत्पादक संघ, लि., (गोकुळ), शिरगाव, जि.कोल्हापूर येथील दुग्धशाळेचे आधुनिकीकरण व बळकटीकरण करणे व ETP प्लांट उभारणी करणे

उपरोक्त दोन प्रस्तावांना संदर्भ क्रमांक २ अन्वये राज्यस्तरीय प्रकल्प समितीने संदर्भ क्रमांक ३ येथील केंद्र शासनाने NPBBDD या कार्यक्रमासाठी निश्चित केलेल्या निधी संरचनेच्या समांतर अर्थसहाय्यावर राकृवियो हिस्सा ५० टक्के व लाभार्थी हिस्सा ५० टक्के या तत्वावर प्रकल्प राबविण्यास मान्यता दिली आहे. उपरोक्तप्रमाणे मान्यता मिळालेल्यानुसार कोल्हापूर जिल्हा सहकारी दूध उत्पादक संघ, लि., (गोकुळ), जि.कोल्हापूर यांच्या शिरोळ, जि.कोल्हापूर येथे अद्यावत दूध प्रक्रिया प्रकल्प (Satellite Dairy) उभारणी व शिरगाव, जि.कोल्हापूर येथील दुग्धशाळेचे आधुनिकीकरण व बळकटीकरण करणे व ETP प्लांट उभारणी करणे या दोन प्रस्तावांना मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

शासन या निर्णयान्वये राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत कोल्हापूर जिल्हा सहकारी दूध उत्पादक संघ, लि., (गोकुळ), जि.कोल्हापूर यांच्या खालील प्रस्तावांना सदर शासन निर्णयात नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून मान्यता देत आहे.

| अ.क्र. | प्रकल्पाचे नाव | प्रकल्प किंमत | राकृवियो हिस्सा (५०%) | लाभार्थी हिस्सा (५०%) | सन २०१४-१५ मध्ये उपलब्ध होणारा निधी | सन २०१४-१५ मध्ये संघाने प्रथम ४ महिन्याकरीता मागणी केल्या-नुसार वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|---|---|
| | शिरोळ, जि.कोल्हापूर येथील अद्यावत दूध प्रक्रिया प्रकल्प (Satellite Dairy) उभारणी | २४,६६,९०,२०५ | १२,३३,४५,१०५ | १२,३३,४५,१०० | ९,८६,००,००० | ५,९०,००,००० |
| | शिरगाव, जि.कोल्हापूर येथील दुग्धशाळेचे आधुनिकीकरण व बळकटीकरण करणे व ETP प्लांट उभारणी करणे | २४,९०,००,००० | १२,४५,००,००० | १२,४५,००,००० | ९,९६,००,००० | ३,२२,००,००० |

सदर प्रकल्पाचा कालावधी २ वर्षाकरीता राहील. सदर प्रकल्प राबविण्याकरीता मंजूर करण्यात आलेल्या प्रकल्पासाठी प्रकल्प विहित कालावधीत पूर्ण करण्याबाबतचे विहित नमुन्यातील बंधपत्र व कामांचा आराखडा आयुक्त, दुग्धव्यवसाय यांना सादर करणे बंधनकारक आहे. आयुक्त , दुग्धव्यवसाय यांनी उपरोक्त संघाकडून विधिग्राहय बंधपत्राचा नमुना निश्चित करुन त्यानुसार संघाकडून बंधपत्र लिहून घ्यावे व ते शासनास सादर करावे. मंजूर करण्यात आलेला निधी सोबत जोडलेल्या परिशिष्ट "अ" मध्ये नमूद केलेल्या मंजूर घटकांकरीता संघाने खर्ची घालावा.

**अटी व शर्ती –**

१. मंजूर प्रकल्प किंमतीपेक्षा प्रकल्पावर होणारा अधिकचा खर्च संघ स्वत: सोसेल. वाढीव प्रकल्पावर होणाऱ्या खर्चासाठी शासन जबाबदार राहणार नाही. तसेच त्याकरीता शासनामार्फत मंजूर प्रकल्प किंमती व्यतिरिक्त निधी मंजूर करण्यात येणार नाही.

२. महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ मर्या., मुंबई यांना त्यांच्या आवश्यकतेप्रमाणे संघाने दूध पुरवठा करणे आवश्यक राहील.

३. राज्यातील दूध कमतरता / अतिरिक्त दूध उत्पादन काळात राज्य शासनाचा निर्णय संघावर बंधनकारक राहील.

४. मंजूर करण्यात आलेल्या निधी बाबत झालेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे जी.एफ.आर.नियम क्रमांक १४९ अन्वये विहित केलेल्या पध्दतीप्रमाणे ठेवावेत व झालेल्या खर्चाचा अहवाल आणि लेख्यांच्या संदर्भात झालेले लेखापरिक्षण या संबंधीची माहिती आयुक्त दुग्धव्यवसाय यांना सादर करण्यात यावी.

५. सहकारी संघाला मंजूर निधीमधून प्राप्त झालेली मिळकतीचे (स्थावर /निमस्थावर) अशा सर्व मिळकतीचे लेखे लेखापरिक्षणास आवश्यकतेप्रमाणे उपलब्ध करुन द्यावेत.

६. संघाला मंजूर करण्यात आलेल्या निधीमधून झालेल्या मिळकतीतील वाढीची याची विल्हेवाट लावण्यापूर्वी शासनाची मान्यता घेणे संघास बंधनकारक राहील.

७. संघास उपलब्ध करुन दिलेल्या निधी उपयोगिता प्रमाणपत्र संघाने आयुक्त, दुग्धव्यवसाय यांचेमार्फत शासनास सादर करावे. वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झाल्याखेरीज उर्वरित निधी वितरीत केला जाणार नाही.

८. मंजूर प्रकल्पाची यशस्वीरीत्या अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हयाचे जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकाऱ्याची राहील. तसेच प्रादेशिक स्तरावर प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी व राज्यस्तरावर आयुक्त दुग्धव्यवसाय विकास हे संनियंत्रण अधिकारी म्हणून राहतील.

९. शासन निधी वितरीत होईल त्या प्रमाणात संघ आपला हिस्सा गुंतविल. सदर प्रकल्प राबविणे सोयीचे व्हावे त्यासाठी संबंधित जिल्हयाचे जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी व संघाचे व्यवस्थापकीय संचालक यांचे संयुक्त खाते बँकेत उघडण्यात यावे. या संयुक्त खात्यामध्ये संघाच्या हिस्स्याची रक्कम ज्या प्रमाणात उपलब्ध होईल त्याच प्रमाणात या योजने अंतर्गत मंजूर असलेली तरतूद संबंधित संघास अदा करण्यात येईल. प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी सदर रक्कम वितरीत करण्यापूर्वी योजनेसाठी संनियंत्रण अधिकारी असल्यामुळे त्यांची मान्यता प्राप्त करुन घेतल्यानंतरच जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी यांनी रक्कम बँकेतून आहरीत करुन संबंधित संघास वितरीत करावी.

१०. या योजने अंतर्गत मंजूर करण्यात आलेल्या निधीचा विनियोग योग्यरीत्या न झाल्यास ती शासकीय नियमानुसार व बंधपत्रातील अटी व तरतूदीनुसार व्याजासहीत संबंधित संघाकडून वसूल करण्यात येईल.

११. सदर योजने अंतर्गत खरेदी करण्यात येणारे सर्व साहीत्य व उभारण्यात येणा-या प्रकल्पासाठी संघाने निविदा प्रक्रीयेचा अवलंब करावा.

१२. या योजने अंतर्गत बसविण्यात येणा-या साहीत्यांवर तसेच योजने अंतर्गत उभारण्यात येणा-या दुग्धशाळा व दूध प्रक्रीया प्रकल्पावर हा प्रकल्प "राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत " असे ठळकपणे दर्शनी भागावर नमूद करणे आवश्यक राहील.

संस्थेने सादर केलेल्या प्रकल्प अहवालानुसार राबविण्यात येत आहे किंवा नाही यासाठी योजनेची पुढीलप्रमाणे प्रकल्प अंमलबजावणी समिती स्थापन करण्यात येत आहे.

१) संबंधित जिल्हयाचे जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी -- अध्यक्ष

२) संघाचे अध्यक्ष -- उपाध्यक्ष
३) विभागीय उपनिबंधक सहकारी संस्था (दुग्ध) -- सदस्य
४) संबंधित जिल्हयाचे जिल्हा अधिक्षक, कृषि अधिकारी -- सदस्य
५) संबंधित जिल्हयाचे जिल्हा पशुसंवर्धन, उपआयुक्त -- सदस्य
६) आयुक्त दुग्धव्यवसाय यांनी नियुक्त केलेला -- सदस्य
७) संबंधित संघाचे व्यवस्थापकीय संचालक -- सदस्य सचिव

उपरोक्त समितीने आपला अहवाल वेळोवेळी शासनास व आयुक्त दुग्धव्यवसाय विकास यांना सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७३०१३२०३४३००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sathe Shashank M

Digitally signed by Sathe Shashank M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sathe Shashank M
Date: 2014.08.02 10:35:25 +05'30'

(श.मा.साठे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.मंत्री (कृषि ), मा.मंत्री (पदुम), मा.राज्यमंत्री (पदुम)यांचे खाजगी सचिव
४. अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
५. मा.सचिव (पदुम) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
६. आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे
७. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
८. आयुक्त दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई-४०० ०१८
९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ म., पश्चिम द्रुतगती मार्ग, गोरेगाव, मुंबई
१०. प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी,पुणे विभाग,पुणे
११. विभागीय उपनिबंधक सहकारी संस्था (दुग्ध) पुणे विभाग, पुणे
१२. जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, पुणे
१३. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, पुणे
१४. जिल्हा अधिक्षक, कृषि अधिकारी, पुणे
१५. महालेखापाल १/२, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), मुंबई/ नागपूर
१६. कक्ष अधिकारी, राकृवियो कक्ष, कृषि व पदुम विभाग, मुंबई
१७. व्यवस्थापकीय संचालक, कोल्हापूर जिल्हा सहकारी दूध उत्पादक संघ, लि., (गोकुळ), जि.कोल्हापूर
१८. निवड नस्ती

## शासन निर्णय क्र.राकृवि २०१४/प्र.क्र.४५/पदुम ८,दि. ३०.७.२०१४ चे परिशिष्ट अ

कार्यक्रमाचे नाव - राष्ट्रीय कृषि विकास योजना (सर्वसाधारण- पायाभूत सुविधा व साधनसामुग्री)

**प्रस्ताव क्रमांक १ :-** **प्रकल्पाचे नाव-** **कोल्हापूर जिल्हा सहकारी दूध उत्पादक संघ, लि., कोल्हापूर (गोकुळ),शिरोळ, जि.कोल्हापूर येथे अद्यावत दूध प्रक्रिया प्रकल्प (Satellite Dairy) उभारणी करणे**

प्रकल्पातील मुख्य घटक- दूध प्रक्रिया प्रकल्प

| अनुक्रम | मंजूर घटक | प्रकल्प किंमत | राष्ट्रीय कृषि विकास योजना हिस्सा (५०%) | संघ हिस्सा (५०%) |
|---|---|---|---|---|
| १ | प्रकल्पाचे बांधकाम | ९२,४९०,२०५ | ४६,२४५,१०५ | ४६,२४५,१०० |
| २ | सयंत्र, यंत्रसामुग्री खर्च | १३९,२००,००० | ६९,६००,००० | ६९,६००,००० |
| ३ | ETP | १५,०००,००० | ७,५००,००० | ७,५००,००० |
| | **एकूण** | **२४६,६९०,२०५** | **१२३,३४५,१०५** | **१२३,३४५,१००** |

**प्रस्ताव क्रमांक २ :-** **प्रकल्पाचे नाव-** **कोल्हापूर जिल्हा सहकारी दूध उत्पादक संघ, लि., कोल्हापूर (गोकुळ), शिरगाव, जि.कोल्हापूर येथील दुग्धशाळेचे आधुनिकीकरण व बळकटीकरण करणे व ETP प्लांट उभारणी**

**प्रकल्पातील मुख्य घटक-** **दूध प्रक्रिया प्रकल्प विस्तारीकरण (प्रति दिन ७ लक्ष वरुन १२ लक्ष )**

| अनुक्रम | मंजूर घटक | प्रकल्प किंमत | राष्ट्रीय कृषि विकास योजना हिस्सा (५०%) | संघ हिस्सा (५०%) |
|---|---|---|---|---|
| १ | मुख्य दुग्धशाळा विस्ता | ११५,०००,००० | ५७,५००,००० | ५७,५००,००० |
| २ | नवीन ETP प्लांट उभारणी | २०,०००,००० | १०,०००,००० | १०,०००,००० |
| ३ | पाश्चरायझर व होमोजिनायझरची क्षमता वाढविणे | १५,०००,००० | ७,५००,००० | ७,५००,००० |
| ४ | पॅकिंग क्षमता वाढविणे | ३२,५००,००० | १६,२५०,००० | १६,२५०,००० |
| ५ | मुख्य दुग्धशाळेचे | ३०,०००,००० | १५,०००,००० | १५,०००,००० |
| ६ | बटर पॅकिंग लाईन टा | २०,०००,००० | १०,०००,००० | १०,०००,००० |
| ७ | दही पॅकिंग लाईन टाकणे | १०,०००,००० | ५,०००,००० | ५,०००,००० |
| ८ | घी (बॉक्स) पॅकिंग मशी | ५,०००,००० | २,५००,००० | २,५००,००० |
| ९ | घी टिन फिलर | १,५००,००० | ७५०,००० | ७५०,००० |
| | एकूण | २४९,०००,००० | १२४,५००,००० | १२४,५००,००० |